**महावितरण कंपनीला आदिवासी उपयोजनेंतर्गत कृषी पंप ग्राहकांना वीज दरात सवलतीसाठी अनुदान वितरण सन २०२१-२२**
**(मागणी क्र.टी-५, लेखाशिर्ष २८०१५६१४).**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.५५/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २२ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/अर्थ-३, दि .२४ जून, २०२१.
२) महावितरण कंपनीचे पत्र क्र.पी-कॉम/शासन/मागणी/सवलत/No २०९७२, दिनांक ०४ जानेवारी, २०२२.
३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र.५५/ऊर्जा-७, दिनांक ०१.१२.२०२१
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. पूरक- २०२१/प्र.क्र.१०६/अर्थ-३, दि. ०३ जानेवारी, २०२२.
५) आदिवासी विकास विभाग, शा. नि. क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.०९/कार्यासन-६, दिनांक १८ फेब्रुवारी, २०२२

**प्रस्तावना :-**

राज्यातील कृषीपंपधारकांना दरवर्षी सवलतीच्या दरात वीज पुरवठा करण्यात येतो व त्याची प्रतिपूर्ती करण्यासाठी महावितरण कंपनीस अर्थसहाय्य देण्यात येते. यापुढेही आदिवासी विकास विभागाच्या आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचीत जमातीच्या संबंधीत कृषीपंपधारक या वैयक्तिक लाभार्थ्यांना वीज दरात सवलत देण्यासाठी आदिवासी विकास विभागाने सन २०२१-२२ करिता महावितरण कंपनीस अर्थसहाय्य उपलब्ध करून दिलेली रु. १५०.०० कोटी इतकी तरतूद संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये वितरीत केली आहे. सन २०२१ च्या डिसेंबरच्या अधिवेशनामध्ये याबाबीसाठी लेखाशिर्ष २८०१५६१४ खाली पुरवणी मागणीअन्वये रु. २००.०० कोटी एवढी तरतूद मंजूर करण्यात आली आहे.

२. डिसेंबर, २०२१ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये खर्चाचे पुरक विवरणपत्र दिनांक २२ डिसेंबर, २०२१ रोजी विधान मंडळास सादर करण्यात आले. दिनांक ३१ मार्च, २०२२ रोजी संपणाऱ्या वित्तिय वर्षाच्या विनियोजनामध्ये समाविष्ट करण्यासाठी, पुरवणी विनियोजन विधेयकास मा. राज्यपालांनी संमती दिली आहे आणि ते, महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०२१ (सन २०२१ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-१७) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक ३० डिसेंबर, २०२१ यामध्ये प्रसिद्ध करण्यात आले आहे. त्यानुषंगाने सदर शासन परिपत्रकातील सुचनांनुसार अर्थसंकल्पिय रक्कम रु. २००.०० कोटी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीस उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना आदिवासी विकास विभागाच्या आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचीत जमातीच्या वैयक्तिक कृषीपंपधारक लाभार्थ्यांना वीज दरात सवलत देण्यासाठी रू. २००,००,००,०००/- (रूपये दोनशे कोटी फक्त) महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करण्यास शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

२. या निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम फक्त अनुसूचीत जमातीच्या लाभार्थ्यांवरच वीज दरात सवलतीपोटी खर्च होईल याची दक्षता विभाग स्तरावर ऊर्जा-५ ने तसेच महावितरण कंपनीने घ्यावी. तसेच ज्या उद्देशासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्देशासाठी तो उपयोगात आणला जाईल, याची जबाबदारी महावितरण कंपनीची राहील.

३. वरील बाबींचा खर्च मागणी क्र.टी-५, २८०१, वीज, उप मुख्यलेखाशिर्ष-०५ पारेषण व वितरण, गौणशिर्ष ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना (०१)(०३) कृषी पंप ग्राहकांना वीजदरात सवलत (आदिवासी घटक कार्यक्रम) (राज्यस्तर योजना) (कार्यक्रम) (२८०१५६१४) ३३, अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करिता मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदरची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. ना. रा. ढाणे, अवर सचिव (ऊर्जा-३) व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री. नारायण श्री. कराड, उप सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर मंजूर झालेली रक्कम रू. २००,००,००,०००/- (रूपये दोनशे कोटी फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरीत करण्याची कार्यवाही करावी.

५ . या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. वित्त विभागाच्या दिनांक २४ जुन, २०२१ च्या परिपत्रकातील सर्व अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. सदर निधीच्या लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे (पुर्व), मुंबई.यांनी आवश्यक तेव्हा महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

७. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाचा अनौ.संदर्भ क्र.१८/का-०६, दि. २७.०१.२०२२ अन्वये व त्यांचे दिनांक १८.०२.२०२२ च्यरा शासन निर्णयातील वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७६, व्यय-१४, दि.११.०२.२०२२ अन्वये मान्यता दिल्यानुसार प्रशासकीय विभागाच्या अधिकारात सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२२१३०२५१०४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2022.02.22 13:05:24 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या, प्रकाशगड, वांद्रे (पुर्व), मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई- ४०० ००१
३. महालेखापाल, महाराष्ट्र-२, ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. आदिवासी विकास विभाग, कार्यासन-०३, ०६ व ०९, मंत्रालय, मुंबई-३२
६. वित्त विभाग, कार्यासन-व्यय-१६/अर्थ-१४, मंत्रालय, मुंबई-३२
७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नाशिक,
९. अवर सचिव ( रोख/प्रशासन ), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.३२
१०. कक्ष अधिकारी ( ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. निवड नस्ती, ऊर्जा-३.